**६० वा महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार सोहळ्याच्या आयोजनाकरीता वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

शासन निर्णय क्रमांक : मचिम-२०२५/प्र.क्र.०९/सां.का.१

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा** : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण- ८२२३/प्र.क्र.६८/सां.का.४, दि.१३.०२.२०२४.

२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. मचिम-२०२४/प्र.क्र.२२/सां.का.१, दि. २१.०२.२०२४.

३) ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. मचिम-२०२४/प्र.क्र.२२/सां.का.१, दि. १४.०३.२०२४.

४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. मचिम-२०२४/प्र.क्र.२२/सां.का.१, दि. २७.०३.२०२५.

५) सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ यांचे पत्र क्र. संकीर्ण/२०२५/म. रा. पु./का. वि./९४, दि.१३.०३.२०२५.

**प्रस्तावना:**

सांस्कृतिक कार्य विभागामार्फत कला / साहित्य क्षेत्रामध्ये उत्कृष्ट योगदान दिलेल्या महनीय व्यक्तींना पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात येते. त्याच पार्श्वभूमीवर चित्रपट क्षेत्राशी निगडीत व्यक्तींनाही विविध पुरस्कारांनी गौरविण्यात येते. तसेच चित्रपट क्षेत्रात विशेष योगदान दिलेल्या व्यक्तींना जीवनगौरव पुरस्कारांनी सन्मानित करण्यात येते. त्यानुसार, ६० वा महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट पुरस्कार सोहळ्यात ३७ पुरस्कार तसेच यासमवेत सन २०२४ चा “चित्रपती व्ही.शांताराम जीवन गौरव पुरस्कार” व “चित्रपती व्ही.शांताराम विशेष योगदान पुरस्कार” आणि “स्व.राजकपूर जीवन गौरव पुरस्कार” व “स्व.राजकपूर विशेष योगदान पुरस्कार” असे एकूण ४१ पुरस्कार वितरण व सोहळ्याचे आयोजन करण्यास्तव एकूण रुपये ४,६४,९०,५३०/- इतक्या निधीस संदर्भ क्र.४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तरी, सदर निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :

६० वा महाराष्ट्र राज्य मराठी सोहळ्याचे आयोजनास्तव करण्यात येणाऱ्या खर्च रक्कम रुपये ४,६४,९०,५३०/- (अक्षरी रुपये चार कोटी चौसष्ट लक्ष नव्वद हजार पाचशे तीस फक्त) इतक्या निधीची प्रतिपूर्ती महामंडळास करण्यासाठी या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-०२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०१) मराठी चित्रपट महोत्सव (२२०५ १५४३)०५-बक्षिसे व ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून खालील नमूद प्रमाणे भागविण्यात यावा. सदरचे अनुदान सशर्त आहे.

| अ.क्र. | बाब | लेखाशिर्ष | रक्कम |
|---|---|---|---|
| १. | पुरस्कार रक्कम | (२२०५ १५४३)०५-बक्षिसे | रुपये ६५,००,०००/- |
| २. | आयोजन खर्च | (२२०५ १५४३)५० -इतर खर्च | रुपये ३,९९,९०,-/५३० |
| **एकूण** | | | **रुपये ४,६४,९०,-/५३०** |

०३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग तीन अ.क्र.४ नियम क्र.२७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त प्राधिकारानुसार काढण्यात येत आहे.

०४. सदर प्रयोजनार्थ करण्यात येणार खर्च महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळाने महामंडळाने प्रथम स्वनिधीतून करावा. सदर करण्यात आलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून यथावकाश करण्यात येईल.

०५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३३/२०२५/का-१४४३, दि.१४.०२.२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९५/२०२५/व्यय-१५, दि.१९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये विहित अटी व शर्ती पूर्ततेच्या अधिन मान्यता देण्यात येत आहे.

०६. या प्रयोजनार्थ वितरित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहिल. यासाठी, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२८११४४२८८५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA
SURYAKANT
DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.28 16:02:10 +05'30'

**(अनिरुध्द सू. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की, उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाही करण्यात यावी.
११. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की,सदर शासन निर्णयातील नमूद रक्कम व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांच्या नावे वितरित करण्यात यावी.
१२. निवडनस्ती (सां.का.१).